ठाणे मध्यवर्ती कारागृह येथे १२६ शौचालये बांधण्यासाठी येणा-या खर्चास व अंदाजपत्रके व नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : बीएलडी २००५/प्र.क्र.१३०/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक :२४ ऑगस्ट, २००५.

वाचा:-१) उप अभियंता कारागृह महानिरीक्षकणालय यांचे पत्र क्र.बीएलडी/ठाणे/मका/१५२३/अतिरिक्त शौचालये/२८४१/कक्ष-३, दि.२८.३.२००५.
२) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अ.शा.प.क्र.बीएलडी/शौचालये/०५/७२२७/कक्ष-३, दि.२८.७.२००५.

शासन निर्णय :-ठाणे मध्यवर्ती कारागृह येथे अतिरिक्त शौचालये बांधण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात असे नमूद करण्यात येते की, मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या याचिका क्र.३८६/२००४ प्रकरणी मा.न्यायालयाने कारागृहातील बंद्याच्या अधिकृत क्षमतेपेक्षा जादा बंदी संख्येनुसार स्वच्छताविषयक बाबी परिपूर्ण असाव्यात असे निर्देश दिलेले असून कारागृह नियमावलीत विनिर्दिष्ट केल्यानुसार प्रत्येक कारागृहाच्या बंदी क्षमतेच्या प्रमाणात अतिरिक्त शौचालये बांधण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार राज्यातील सर्व कारागृहात बंदी क्षमतेच्या प्रमाणात अतिरिक्त शौचालये बांधावी लागणार आहेत. त्या अनुषंगाने ठाणे मध्यवर्ती कारागृह येथे १२६ नवीन शौचालये ह बांधणे आवश्यक असल्यामुळे कारागृह महानिरीक्षणालयाने उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये सदर १२६ शौचालये बांधण्यासाठी लागणा-या रु.६०,८४,१५५ /- इतक्या खर्चाचा प्रस्ताव व अंदाजपत्रक आणि नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहेत.

२. उपरोक्त परिस्थितीत सदर बाब न्यायालयाच्या अधिन असल्याने त्याची प्राधान्याने पूर्तता करणे आवश्यक आहे. तसेच यामुळे बंद्याच्या सोयीसुविधेत होणारी वाढ व कारागृहातील स्वच्छता इत्यादी बाबीचा विचार करुन ठाणे मध्यवर्ती कारागृह येथे बंद्याकरीता उपरोक्त परिच्छेदात नमूद केल्याप्रमाणे एकूण १२६ शौचालये बांधण्यासाठी रु.६०,८४,१५५/-/- (रुपये साठ लाख चौ-याऐंशी हजार एकशे पंचावन्न फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रके आणि नकाशास शासन या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८, मुख्य लेखाशिर्ष "४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ०१, कार्यालयीन इमारती १०१, बांधकाम,

पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००) (०१) तुरुंग या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.१९ जुलै, २००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग पाचच्या परिशिष्ठामधील अनु.क्र.१ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( आ. ग. परदेशी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई,
अधिक्षक, ठाणे मध्यवर्ती कारागृह, ठाणे,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा),१ महाराष्ट्र राज्य,मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उप विभाग, ठाणे.
उप सचिव (इमारती-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
श्री.बी.आर.कांबळे, उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
अवर सचिव,वीपुडी-४,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
निवड नस्ती,पीआरएस-२,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२